अपर पोलीस महासंचालक ( महाराष्ट्र राज्य सायबर) मुंबई यांच्या नियंत्रणाखालील कार्यालयासाठी जागतिक व्यापार केंद्र, मुंबई येथील एकुण १०४६९ चौ. फुट जागेबाबत माहे, दि.१४.०३.२०२४ ते दि.१३.०३.२०२५ या कालावधीतील भाडेकरार करण्यास मान्यता देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्र.संकीर्ण-०९२३/प्र.क्र.१६४/विशा-३(अ)
मंत्रालय,मुंबई-४०००३२
दिनांक: १९ मार्च, २०२५

संदर्भ:-

१) शासन निर्णय,संकीर्ण२०१५/प्र.क्र.११९/विशा-३अ,दि.०५.०१.२०१६
२) शासन निर्णय,संकीर्ण२०१६/प्र.क्र.०५/विशा-३अ,दि.०९.०३.२०१६
३) शासन निर्णय,संकीर्ण२०१६/प्र.क्र.०५/विशा-३अ,दि.०७.०४.२०१६
४) शासन निर्णय,संकीर्ण२०१६/प्र.क्र.०५/विशा-३अ,दि.१९.०९.२०१८
५) शासन निर्णय,संकीर्ण२०१६/प्र.क्र.०५/विशा-३अ,दि.३०.०६.२०२०
६) शासन निर्णय,संकीर्ण२०१६/प्र.क्र.०५/विशा-३अ,दि.२१.०८.२०२०
७) शासन निर्णय,संकीर्ण०९२३/प्र.क्र.१६४/विशा-३अ,दि.०८.०९.२०२३
८) शासन निर्णय,संकीर्ण०९२३/प्र.क्र.१६४/विशा-३अ,दि.०४.१०.२०२३

प्रस्तावना:-

राज्यात राबविण्यात येणाऱ्या सायबर सुरक्षा प्रकल्पाच्या प्रभावी अंमलबजावणीकरीता महाराष्ट्र राज्य सायबर कार्यालयाचे कार्यान्वन तातडीने व विनाविलंब होणे आवश्यक असल्याने सदर कार्यालयासाठी उपरोक्त संदर्भाधीन क्र. २ व ३ च्या शासन निर्णयान्वये एकूण १०४६९ चौ. फुट जागा (८४६९ चौ. फूट सायबर व महिला अत्याचार कक्षासाठी व २००० चौ. फूट आर्थिक गुन्हे शाखेसाठी) उपलब्ध करून दिली आहे. त्यानुसार शासनाच्या वतीने विशेष पोलीस महानिरीक्षक, सायबर, मुंबई व M.Visvesvaraya Industrial Research and Development Centre या संस्थेमध्ये करार करण्यात आला होता. सदर करार संपुष्टात आल्यामुळे शासन स्तरावरून उपरोक्त संदर्भ क्र. ४ ते ८ येथील शासन निर्णयान्वये भाडे करारास वेळोवळी मुदतवाढ देण्यात आली आहे. सद्यस्थितीत राज्यात राबविण्यात येणाऱ्या सायबर सुरक्षा प्रकल्पाच्या प्रभावी अंमलबजावणीकरीता तसेच सायबर कार्यालयाचे कार्यान्वयन तातडीने व विनाविलंब होण्यासाठी भाडेतत्वावर यापुर्वी उपलब्ध करून दिलेल्या एकूण १०४६९ चौ. फुट जागेबाबत अपर पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य सायबर, मुंबई व M.Visvesvaraya Industrial Research and Development Centre या संस्थेमध्ये दि.१४.०३.२०२४ ते १३.०३.२०२५ पर्यंत करार करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय:-

अपर पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य सायबर, मुंबई यांच्या अधिनस्त असलेल्या सायबर कार्यालयास यापूर्वी शासनाच्या मान्यतेने करण्यात आलेल्या भाडे करारातील अटी व शर्तींच्या अधीन राहून मुदत संपलेल्या दिनांकापासून दि.१४.०३.२०२४ ते १३.०३.२०२५ पर्यंत

जागतिक व्यापार केंद्र इमारत, कफ परेड, मुंबई येथील बत्तीसाव्या मजल्यावरील एकूण १०४६९ चौ फुट जागेबाबत अपर पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य सायबर, मुंबई व M. Visvesvaraya Industrial Research and Development Centre या संस्थेमध्ये करार करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. वरील मान्यता वित्तीय अधिकार अधिनियम पुस्तिका १९७८, भाग पहिला, उपविभाग-१, अनुक्रमांक १०, नियम ११५ मधील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

३. उपरोक्त संदर्भाधीन क्र.०२ मधील शासन निर्णयान्वये सदरहू करार करण्याच्या अनुषंगाने जागतिक व्यापार केंद्र, कफ परेड, मुंबई यांचेसोबत आवश्यक ती कार्यवाही करण्यासाठी शासनाच्या वतीने विशेष पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य सायबर, मुंबई यांना पुढील आदेशापर्यंत प्राधिकृत करण्यात आले आहे. सबब, त्यानुसार सद्यस्थितीत अपर पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य सायबर, मुंबई यांनी भाडेकरार करण्याची कार्यवाही करावी, सदरहु भाडेकरार करतांना जागतिक व्यापार केंद्र मुंबई येथील कार्यालय महापे,नवी मुंबई येथे उपरोक्त नमूद भाडेकराराच्या कालावधीत स्थलांतरीत झाल्यास, होण्याऱ्या अनुषंगिक अटी व शर्तीचा समावेश सदर भाडेकरारात करण्याची दक्षता महाराष्ट्र राज्य सायबर, कार्यालय यांनी घ्यावी.

४. सदर शासन निर्णयानुसार भाडेकरार त्वरीत करण्यात यावा. तथापि, सदरहू भाडेकरार करण्यास विलंब झाल्यास त्याबाबतचे वित्तीय दायित्वाची जबाबदारी संबंधित कार्यालयाची राहील.

५. दि.१४.०३.२०२४ ते १३.०३.२०२५ पर्यंत या कालवधीतील भाडे करारामुळे येणारा खर्च मागणी क्र. बी-१, २०५५ - पोलीस, (००) (००) १०१ गुन्हा अन्वेषण व दक्षता, (००) (०६) सायबर व महिला अत्याचार प्रतिबंध कक्ष, योजनेतर (२०५५ ए ०२३)" या लेखाशीर्षाखालील, १४ भाडेपट्टी व इतर खर्च, या उहिष्टाखालील अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३१९१६२४२४८०२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SWAPNA NILESH DESHPANDE

Digitally signed by SWAPNA NILESH DESHPANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=8f33d110713d529fd14cadb7107a7a56252382926dfbbe68e0ce49aae150e1e8, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F68C2CBBE864D14D120F29960E8E60D5C00E2D614E6A0234A132D68EADBD05CC, cn=SWAPNA NILESH DESHPANDE
Date: 2025.03.19 16:25:24 +05'30'

**( स्वप्ना देशपांडे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. अपर पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य सायबर, मुंबई.
३. संचालक जागतिक व्यापार केंद्र, कफ परेड, मुंबई.
४. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा), मुंबई.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी , मुंबई.
७. निवड नस्ती, गृह विभाग/ विशा ३ अ.